**दंडोबा देवस्थान, मिरज या पर्यटन स्थळाकरिता येणाऱ्या भाविकांसाठी सोयीसुविधा पुरविणे व सुधारणा करणे इ. कामाचे अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.निसप्र-२०१६/प्र.क्र.११२/फ-५**
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २४ नोव्हेंबर, २०१६

__पहावे__ - १) जिल्हाधिकारी व सदस्य सचिव जिल्हा नियोजन समिती सांगली यांचे पत्र क्रं.नियोजन /का १४-१ (४) पर्यटन/ २६७८/२०१६, दिनांक २२/८/२०१६.
२) विभागीय वन अधिकारी सांगली, यांचे पत्र क्र. ब/योजना/पर्यटन/२०१६-१७/७८५ सांगली-कुपवाडा दि.१८/७/२०१६

__प्रस्तावना__ -

जिल्हाधिकारी व सदस्य सचिव जिल्हा नियोजन समिती सांगली यांचेकडील दि.२२/०८/२०१६ च्या पत्रान्वये दंडोबा देवस्थान पर्यटन स्थळाकरिता येणाऱ्या भाविकांसाठी सोयीसुविधा पुरविणे व सुधारणा करणे इ. कामाच्या रु.२५२.५२ लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

सदरहू बांधकामाच्या रु. २५२.५२ लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विभागीय वन अधिकारी सांगली अंतर्गत, सांगली जिल्हयातील दंडोबा देवस्थान, मिरज या पर्यटन स्थळाकरिता येणाऱ्या भाविकांसाठी सोयीसुविधा पुरविणे व सुधारणा करणे इ.कामाच्या रु. **२५२.५२** लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीच्या व खालील अटीच्या अधीन राहून, शासनाची प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) प्रदान करण्यात येत आहे.

१) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करून घ्यावी.
२) सदरील काम जर अर्थसंकल्पाव्यतिरिक्त करावयाचे झाल्यास त्यात ४% सेंटेज चार्जेस ची तरतूद मिळविण्यात यावी.
३) काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रक उपभोक्ता विभागाकडून व तसेच मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांच्याकडून स्वाक्षांकित करुन घ्यावे.
४) प्रत्यक्ष काम करते वेळेस पर्यावरण विभाग शासन निर्णय क्र. ईएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां. इ. १ दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) प्रस्तुत कामाची एकत्रित निविदा काढण्यात यावी.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र. ७०/२००८/ विनियम, दि. १५ मे २००९ , वित्तीय अधिनियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग- पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र.१, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४८७/१६/इमा-३ दि. १६/११/२०१६ ला अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११२४१५०८४६५५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2016.11.24 15:11:41 +05'30'

**(प्रकाश महाजन)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य,नागपुर
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपुर
५. मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) कोल्हापूर.
६. विभागीय आयुक्त, आयुक्त पुणे, विभाग पुणे.
७. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सांगली.
८. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर.
९. विभागीय वन अधिकारी, सांगली.
१०.महालेखापाल,१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षण) मुंबई / नागपुर
११.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
१२.कक्ष अधिकारी (व्यय-१०)(विनियम) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१३.नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय,मुंबई-३२.
१४.ब-१/फ-१/फ-२ कार्यासन ,महसुल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१५.कार्यासन फ-५, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२ (निवड नस्ती )